**छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचे ३५० व्या वर्षानिमित्त "मराठा साम्राज्याचे चलन "विषयी जनजागृती करणेसाठी दर्शनिका विभागाकडून आयोजित करण्यात येणाऱ्या एक दिवसीय परिसंवादास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- दर्शनि-२०२३/प्र.क्र.१९१/सां.का. २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-३२.
दिनांक : १२ मार्च, २०२४.

**वाचा:-**
१. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, सां.का. ४ यांचे पत्र क्र. संकीर्ण ८२२३/प्र.क्र.२६७/सां.का.४, दिनांक ०१.०८.२०२३
२. कार्यकारी संपादक तथा सचिव, दर्शनिका विभाग यांचे पत्र क्र. ६६२, दिनांक २३.०८.२०२३
३. कार्यकारी संपादक तथा सचिव, दर्शनिका विभाग यांचे पत्र क्र. ९९१, दिनांक ०५.१२.२०२३
४. कार्यकारी संपादक तथा सचिव, दर्शनिका विभाग यांचे पत्र क्र. १७८, दिनांक २७.०२.२०२४

**प्रस्तावना:-**

छत्रपती शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाचे ३५० व्या वर्षानिमित्त विविध सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन करण्यासाठी दि. १५ जुलै, २०२३ रोजी मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत दर्शनिका विभागास शिवकालीन नाण्यांबाबत जाणीव जागृती चर्चासत्रे आयोजित करण्याचे निर्देश देण्यात आले होते. सदर निर्देशांच्या अनुषंगाने दर्शनिका विभागाकडून जळगाव व मुंबई येथे आयोजित करण्यात आलेल्या "मराठा साम्राज्याचे चलन" या विषयावरील एक दिवसीय परिसंवादासाठी झालेल्या रू. रू.१,९१,५५९/-(अक्षरी रूपये एक लक्ष, एक्याण्णव हजार, पाचशे एकोणसाठ फक्त) इतक्या खर्चास कार्योत्तर प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची व दर्शनिका विभागाकडून संभाजीनगर, नाशिक, नागपूर, चिपळून (रत्नागिरी), कोल्हापूर व चंद्रपूर या ६ जिल्ह्यात "मराठा साम्राज्याचे चलन" या विषयावर एकदिवसीय परिसंवाद आयोजित करण्यात येणार असून यासाठी होणा-या प्रत्येकी अंदाजित रू.९०,०००/- (अक्षरी रुपये नव्वद हजार) याप्रमाणे एकूण रु. ५ लक्ष ४० हजार एवढया खर्चाच्या प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची विनंती उपरोक्त संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये केली आहे. त्यानुसार सदरहू प्रस्तावास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या राज्याभिषेक सोहळयानिमित्त दर्शनिका विभागाकडून जळगाव व मुंबई आयोजित करण्यात आलेल्या "मराठा साम्राज्याचे चलन" या विषयावरील १ दिवसीय परिसंवादासाठी झालेल्या रू.१,९१,५५९/- (अक्षरी रूपये एक लक्ष, एक्याण्णव हजार, पाचशे एकोणसाठ फक्त) इतक्या खर्चास सदर शासन निर्णयान्वये कार्योत्तर प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

तसेच छत्रपती शिवाजी महाराज यांच्या ३५० व्या राज्याभिषेक सोहळयानिमित्त दर्शनिका विभागास "मराठा साम्राज्याचे चलन" या विषयावर संभाजीनगर, नाशिक, नागपूर, चिपळूण (रत्नागिरी) कोल्हापूर व चंद्रपूर या ६ जिल्ह्यात १ दिवसीय परिसंवाद आयोजित करण्यास व यासाठी होणाऱ्या अंदाजित खर्च रु.५,४०,०००/-(अक्षरी रूपये पाच लक्ष,चाळीस हजार फक्त) इतक्या रकमेच्या प्रस्तावास सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च "मागणी क्रमांक झेडडी-०१, ६० इतर,११० प्रकाशने, (०१) महाराष्ट्र राज्य समिती (०१) (०१) भारतीय स्वातंत्र्य आंदोलन इतिहास समिती,महाराष्ट्र राज्य (कार्यक्रम) -१३ कार्यालयीन खर्च" या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

०३. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३ /प्र.क्र.३०/२०१३ /विनियम, भाग-दोन, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.४, परिच्छेद क्र. २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१२१५३५२८१५२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने स्वक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NANDA MARUTI RAUT

Digitally signed by NANDA MARUTI RAUT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL DEPARTMENT, 2.5.4.20=281d8ee0076aee3a052a490903f93deadef9f7e2a186620ec03666d244838270, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BAF9D9317025580944685E047B9C52D64C532684054F19E1F02C374B78E1773F, cn=NANDA MARUTI RAUT
Date: 2024.03.12 15:46:38 +05'30'

**( नंदा राऊत )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत -**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री तथा वित्त मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६. मा.प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. महालेखापाल, लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता महाराष्ट्र-१ , मुंबई
८. सह सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सह सचिव (व्यय-१५, वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१२. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग मंत्रालय, मुंबई
१३. कार्यकारी संपादक व सचिव, दर्शनिका विभाग, मुंबई
१४. निवड नस्ती, सां.का.२